**मौजे बारव, ता. जुन्नर, जि. पुणे येथील**
**सांस्कृतिक संकुलाच्या वाढीव बांधकामाच्या**
**प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्र.भवन- २०१३/प्र.क्र.१६५/ का. १७**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक : ०६ ऑगस्ट, २०१४**

<u>वाचा :-</u>
१. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग. क्र. संकीर्ण २००१/प्रक्र २३८(२००१) /का-०८, दिनांक १५ मे, २००४
२. शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग क्र. संकीर्ण २०११/प्रक्र १११/ का-१७, दिनांक १३ मार्च, २०१२
३. शासन निर्णय. क्र. आदिवासी विकास विभाग संकुल-२०११/प्रक्र १११/ का-१७, दिनांक ३ एप्रिल, २०१२
४ अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांचे पत्र क्र. नियो- २०१३/ प्र.क्र. /का-(१), दि.१८/०६/२०१४

**<u>प्रस्तावना :-</u>**

मौजे बारव, ता.जुन्नर, जि.पुणे येथील महादेव कोळी समाज प्रबोधीनी सामाजिक संस्थेच्या सर्वे नं. १३/२ येथे उपलब्ध असलेल्या शासकीय जमिनीवर आदिवासी समाजासाठी सांस्कृतिक संकुल बांधकामासाठी रु. ९६,५१,४३९/- इतक्या खर्चास संदर्भाधिन क्रमांक ३ मधील दिनांक ३ एप्रिल, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर संकुलाच्या तळ मजला २४.३३ चौ.मी. व पहिल्या मजल्यावरील ३४५.३९ चौ.मी. वाढीव बांधकामाकरिता रु. ९९,९७,०००/- इतक्या रकमेचे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (उत्तर), पुणे-१ यांनी सादर केलेले अंदाजपत्रक अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.४ वरील पत्रान्वये शासनाकडे मान्यतेसाठी सादर केले आहे. सदर वाढीव बांधकामाच्या रु. ९३,०८, ६३६/- इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. सदर वाढीव कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

मौजे बारव, ता.जुन्नर, जि.पुणे येथील सांस्कृतिक संकुलाच्या तळमजला २४.३३ चौ.मी. व पहिला मजला ३४५.३९ चौ.मी. रु. ९३,०८, ६३६/- ( अक्षरी रु.त्र्याण्णव लाख आठ हजार सहाशे छत्तीस फक्त )इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील नमूद अटींच्या अधिन राहून" विशेष बाब"म्हणून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(१) पहिल्या वाढीव मजल्याचे बांधकाम करताना प्रगतीत असलेल्या तळमजल्याच्या आरसीसी संकल्पानात प्रस्तावित मजला वाढीसाठी तरतूद असल्याची खात्री करुन घ्यावी.
(२) अधिक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे साक्षांकन आवश्यक आहे.
(३) अंदाजपत्रकात टेस्टींग सर्विस (१ %) आकस्मिक खर्च (४ %), विद्युतीकरण (५ %),बाहय पाणीपुरवठा ( २.१ %) एवढी तरतूद करण्यात येऊन विमा व टी. ॲण्ड पी. ची तरतूद वगळण्यात आली आहे.
(४) संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयामध्ये एका तालुक्यामध्ये जास्तीत-जास्त दोन सांस्कृतिक संकुल मंजूर करण्याची तरतूद आहे. मौजे बारव, ता.जुन्नर, जि.पुणे येथील सांस्कृतिक संकुलाच्या वाढीव बांधकामास " विशेष बाब" म्हणून मान्यता देण्यात येत असल्याने जुन्नर तालुक्यात दुसरे सांस्कृतिक संकुल मंजूर करता येणार नाही.
(५) वरील अटींव्यतिरिक्त संदर्भ क्र.३ वरील शासन निर्णयातील अटींच्या अधिन राहून कार्यवाही करावी.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. विअप्र-१०.०८/प्रक्र ७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९ च्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८३/इमा-२, दिनांक ०४/०८/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१४०८०६१८१२०२२०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANJAY KASHINATH GAMBRE

Digitally signed by SANJAY KASHINATH GAMBRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SANJAY KASHINATH GAMBRE
Date: 2014.08.06 18:11:15 +05'30'

( सं.का.गंब्रे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री /मा.राज्यमंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
२. मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
३. मा.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक बांधकाम विभाग, पुणे
५. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
६. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
७. जिल्हाधिकारी,पुणे
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, पुणे-१
१०.प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, घोडेगाव, ता.आंबेगाव, जि.पुणे
११.जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
१२.वित्त विभाग, (विनियम/व्यय-१४/अर्थसंकल्प-३) मंत्रालय, मुंबई -३२
१३.उप सचिव (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२
१४.उपसचिव/अवर सचिव (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१५.कक्ष अधिकारी, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१६.निवड नस्ती (का.१७)